तात्काळ/महत्वाचे

क्र.बीजीटी- १०/२००१/सीआर-८४/बीयुडी-१,
गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २१ सप्टेंबर,२००१.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महासंचालक, अँन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
संचालक, न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महासमादेशक, होमगार्डस व संचालक नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस शल्य चिकीत्सक, मुंबई.
संचालक, सरकारी अभियोग, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे.
मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादीत, मुंबई.
जिल्हा दंडाधिकारी(नाशिक,अहमदनगर,कोल्हापूर,सातारा,ठाणे,पुणे,सोलापूर,सांगली).
सर्व जिल्हा सत्र न्यायाधीश व सदस्य मोटार अपघात दावा न्यायाधिकरण.
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
प्रबंधक, राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
मुख्य महानगर दंडाधिकारी एक्सप्लनेड कोर्ट, मुंबई.
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,चेंबुरकर मार्ग,चेंबूर,मुंबई.
उप सचिव,(रोख उपशाखा,पर्यटन,सेकपी-१,एचडीओ-१,विशा-४,पोल-७,विशा-१०, राज्य मानवी हक्क आयोग) गृहविभाग,मुंबई.

विषय:- मंजूर तरतुदीपेक्षा अधिक खर्च न करणे

महोदय,

राज्याच्या वार्षिक विनियोजन लेख्यावरील लेखापरिक्षा अहवालात वर्षानुवर्षे अर्थसंकल्पिय नियमबाहय गोष्टी खालीलप्रमाणे सतत घडत असल्याचे निदर्शनास आले आहे.

१) अनावश्यक किंवा जादा पुरक अनुदाने.
२) तारतम्यहीन पुनर्विनियोजने व रकमाचे प्रत्यार्पण आणि परिणामी नियत वाटपा पेक्षा अधिक खर्च.
३) अनावश्यक किंवा आवश्यकते पेक्षा जादा मिळवलेले पुनर्विनियोजन.
४) अनुदानाची मागणी न करता केलेला जादा खर्च.
५) अपेक्षित बचतीच्या रकमाचे प्रत्यार्पण न करणे.
६) सदोष अर्थसंकल्पिय अंदाज.

प्रामुख्याने अर्थसंकल्पात मंजूर असलेल्या तरतुदीपेक्षा अधिक खर्च झाल्यास विनियोजन लेख्यामध्ये महालेखापालाना स्पष्टीकरण दयावे लागते व विभागाच्या सचिवाना लोकलेखा समिती समोर प्रत्यक्ष साक्ष दयावी लागते.त्यावेळी विभागाच्या अधिकाऱ्यावर व

कार्यपध्दतीवर लोकलेखा समितीकडून ताशेरे ओढले जातात.याबाबत असे आदेश देण्यात येत आहेत की, मंजूर तरतुदीपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी काळजी घ्यावी; अधिक खर्च झाल्यास त्या समर्थनार्थ कोणत्याही स्पष्टीकरणाचा विचार करण्यात येणार नाही व त्यासाठी नियंत्रक अधिकारी वैयक्तीकरित्या जबाबदार राहतील. यांची सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांनी कृपया गंभीरपणे नोंद घ्यावी.

आपला,

( सतीश त्रिपाठी )
प्रधान सचिव (अ.व सु.) महाराष्ट्र शासन, गृह विभाग